Research Paper | Economics | E-ISSN No : 2454-9916 | Volume : 7 | Issue : 12 | Dec 2021




# SPECIAL ECONOMIC ZONE: PROBLEMS AND SOLUTIONS

# विशेष आर्थिक क्षेत्र : समस्या व उपाय

Dr. Jayshri Purushottam Sarode

Associate Professor, Dadasaheb D. N. Bhole College, Bhusawal, Dist – Jalgaon, Maharashtra, India.

**प्रस्तावना :**

परकिय चलन गंगाजळीची रक्कम २०० अब्ज डॉलर्स पेक्षा जास्त असलेल्या जगातील मोजक्या देशात भारताचा क्रमांक अलीकडेच लागला आहे. परंतु गेल्या काही दशकात भारताची निर्यात आयातीपेक्षा कधीही जास्त झालेली नाही. त्यामुळे परकिय चलन गंगाजळीतील वाढ एका अर्थाने संख्यात्मक आहे. गुणात्मक आहे का? भारतात गुंतवणूक करण्यास विदेशी गुंतवणूक करणाऱ्यांनी स्वारस्य दाखविले इतकाच त्याचा अर्थ विदेशी चलन गंगाजळीतील दिर्घकालीन, हक्काची आणखी वाढ ही सकारात्मक विदेशी व्यापार तेलामुळे होते. बहुतेक सर्व देश आयात मर्यादित करण्यावर व निर्यात वृध्दीवर भर देतात. अर्थव्यवस्थेच्या विकासाचा टप्पा, तंत्रज्ञान विकास, नैसर्गिक संसाधने यांची उपलब्धता अशा कारणांनी आयात मर्यादित ठेवणे अनेकदा शक्य होत नाही म्हणून सकारात्मक व्यापारी तोल साधण्यासाठी निर्यात वृध्दी प्रयत्नपूर्वक करणे हा मार्ग उरतो.

भारतीय शासनानेही गेल्या काही दशकात अनेक उपाय योजून निर्यात वाढविण्याचा प्रयत्न केला. त्यात अल्प व्याजदराने निर्यातीसाठी कर्ज, निर्यात उत्पन्नावर आयकरातून सवलती, माल वाहतुकीसाठी सवलती अशांचा समावेश करता येईल. निर्यात वाढीच्या या योजनांपैकी अगदी अलीकडच्या काळात प्रकर्षाने पुढे आलेली व बहुचर्चित योजना म्हणजे "विशेष आर्थिक क्षेत्र" होय.

**संशोधनाची उद्दिष्ट्ये :**

१) "विशेष आर्थिक क्षेत्र" कशासाठी हवे ते तपासणे.
२) भारत व विशेष आर्थिक क्षेत्र यांची सांगड तपासणे.
३) "विशेष आर्थिक क्षेत्र" समस्या अभ्यासणे.
४) समस्यांवरील उपाय सुचावणे.

भारतीय व्यावसायिकांना नव्या संधी उपलब्ध होतील. निर्यातीच्या माध्यमाने मोठ्या प्रमाणावर उत्पन्न प्राप्ती होऊन विदेशी विनिमयाच्या साठ्यात वाढ होऊ शकेल आणि आर्थिक मागासलेपण कमी करण्यास `सेझ` उपयुक्त ठरु शकेल असे चित्र रंगविण्यात आले.

परंतु हे धोरण फायद्याचे वाटले तरीही ते राबविणे तितकेसे सोपे नाही. कारण विदेशातील व स्वदेशातील मोठ्या उद्योगांना आकृष्ट करण्यासाठी किती सोयी व सवलती द्यायच्या त्यासाठी शासनाने किती गुंतवणूक करायची, आपले किती आर्थिक नुकसान होऊ द्यायचे, उद्योजकांना जमीन उपलब्ध करून देतांना शेतकऱ्यांना किती मोबदला द्यायचा यामुळे विस्थापित झालेल्या नागरिकांचे प्रश्न त्यांच्या अधिकारांची पायमल्ली न करता कसे सोडवायचे व त्यांना स्थायी स्वरुपाच्या उत्पन्नाची नवी साधने कशी व कोठे उपलब्ध करून द्यायची हे विविध प्रश्न आज `सेझ` च्या निमित्ताने उभे ठाकले आहेत. या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे देण्याएवजी या धोरणाला कसे पुढे रेटता येईल याचाच विचार शासन करीत आहे असा समज या प्रकल्पामुळे प्रभावित होणाऱ्या जनतेचा झाला आहे. त्यामुळे `सेझ` च्या संदर्भात शासन विरुद्ध 'सेझ' प्रकल्पग्रस्त असा संघर्ष सुरु झाला आहे. कायदा होतांना जी चर्चा अपेक्षित होती ती कायदा झाल्यावर त्याच्या अंमलबजावणीच्या वेळेस होऊ लागली आहे. हे धोरण ठरवितांना `सेझ` मुळे प्रभावित होणाऱ्या लोकांना विश्वासात घेतले नव्हते.

राष्ट्रीय लोकतंत्र आघाडीतील पक्षांनी स्वीकारलेले `सेझ` चे हे धोरण संयुक्त पुरोगामी आघाडीताल पक्षांनी व प. बंगालमधील कम्युनिष्ट पक्षांनेही स्वीकारलेले दिसते. राजकीय पक्षांचा हा पुढाकार लक्षात घेता `सेझ` अस्तित्वात येणार ही बाब स्वीकारून यापुढे काय करता येईल याचा खरेतर विचार व्हायला हवा.

**`विशेष आर्थिक क्षेत्र` कशासाठी :**

निर्यातवाढीसाठी उद्योग निर्यातक्षम हवेत तसेच उत्पादनेही निर्यातक्षम हवीत. शेती व सेवा क्षेत्रातूनही निर्यात वाढू शकते. परंतु त्यासाठी उत्तम दर्जाच्या व विपुल पायाभूत सुविधांची आवश्यकता असते. रस्ते, दळणवळणाची सुविधा, वाहतुकीचे साधने, बंदरे, विमानतळ, विजेची उपलब्धता, संशोधनाच्या सोयी इ. निर्माण करायला हव्यात. पायाभूत सोयी निर्माण करण्याचा मक्ता भारतात स्वातंत्र्यानंतर शासनाकडे होता. अलीकडच्या नवीन आर्थिक धोरणाच्या काळात त्यात थोडा खाजगी क्षेत्राचा सहभाग सुरु झाला. शासनाकडे उपलब्ध असणारा निधी पायाभूत सुविधांची गरज लक्षात घेता फारच मर्यादित आहे. भारतासारख्या विशाल देशात मर्यादित निधीद्वारे पायाभूत सुविधांचा विकास स्वाभाविकपणे अपूर्ण आणि मंद गतीने झाला त्याचा नकारात्मक परिणाम उद्योगाच्या संख्येवर दर्जावर झाला. शेती व सेवा क्षेत्राचा विकासही मर्यादित गतीने झाला, उद्योग, शेती व सेवा क्षेत्र पुरसे निर्यातक्षम न होण्याला अपुऱ्या व सुमार दर्जाच्या पायाभूत सुविधा कारणीभूत ठरल्या. यावर उपाय म्हणून `औद्योगिक बेटांचा` विचार सुरु झाला. विशिष्ट भौगोलिक क्षेत्र निवडून त्यात खाजगी क्षेत्राने मूलभूत सुविधा विकसित करायच्या व त्यासाठी खाजगी क्षेत्राला सवलती द्यायच्या हे सूत्र विआक्षेत्राचा आधार आहे. विदेशी भांडवली आकर्षित केले तर उद्योग, शेती व सेवाक्षेत्राची भरभराट होऊ शकेल ते निर्यातक्षम होऊ शकतात.

निर्यात वाढीतील आणखी एक अडसर म्हणजे प्रशासकीय प्रक्रिया शासनाचे कायदे, नियम, परिपत्रके, ठराव इत्यादींच्या जंजाळात उद्योग, शेती व सेवा क्षेत्र अडकून गेले आहे. परवानग्या नोंदणी, अनुज्ञाप्ती, तपासण्या मंजुऱ्या संख्येने भरपूर आहेत. त्यांची प्रक्रिया खूप लांबलचक व क्लिष्ट आहे. अनेक वेळा `भीक नको पण कुत्रा आवर` अशी स्थिती येते. निर्यातीतील खरी किंमत वेळेची असते. पण त्यावेळी अर्थव्यवस्थेचा विचार करता नियम, कायदे आवश्यकही असतात. म्हणून विशिष्ट क्षेत्रापुरती प्रक्रिया शिथिल केली.

**भारत व विशेष आर्थिक क्षेत्र :**

संपूर्ण जगात होणाऱ्या आर्थिक बदलाकडे आपण साशकतेने पाहात होतो. कारण

१९४७ साली नुकतेच स्वातंत्र्य मिळाले होते व सन १९५१ पासून समाजवादी समाजरचना निर्माण करण्याच्या हेतूने मिश्र अर्थव्यवस्थेचा भारताने स्वीकार करून पंचवार्षिक योजनाच्या माध्यामातून आर्थिक विकासाला सुरुवात केली. या दृष्टीने देशातील निर्यातीला / विदेशी व्यापाराला चालना देण्यासाठी सन १९६५ साली कांडला येथे पहिले मुक्त व्यापार क्षेत्र सुरु केले. नंतर १९७४ मध्ये कोचीन, मुंबई, चेन्नई, विशाखापट्टणम, सुरत येथे मुक्त व्यापार क्षेत्र सुरु झाले. मुक्त व्यापार क्षेत्र ने इतर देशाच्या तुलनेत वि. आ. क्षे. सारखेच होते. मुक्त व्यापार क्षेत्रामध्ये नियंतभूमख व्यावसायीकांना काही ना काही प्रमाणात सवलती दिल्या जात होत्या. मात्र त्या प्रमाणात निर्यातीमध्ये फारशी वाढ होत नव्हती. ही वस्तुस्थिती एका बाजूला तर दुसऱ्या बाजूला चीन, कोरीया, सिंगापूर, मलेशिया, अमेरिका येथील वि. आ. क्षे. वाटचाल व विस्तार लक्षात घेऊन भारत सरकाने सन १९९७-२००२ मधील आयात निर्यात धोरणामध्ये सुधारणा करून सन मार्च २००० मध्ये "विशेष आर्थिक क्षेत्राची संकल्पना स्वीकारली. त्यानंतरच्या काळात भारतीय निर्यातदारांचा व्यापार सुरक्षित होण्यासाठी व्यापारी वर्गाचा सतत होणारा दबाव व मागणी लक्षात घेऊन भारत सरकारने सन २००५ मध्ये `विशेष आर्थिक क्षेत्र` विषयक कायदा पारित केला. संसदेने हा कायदा पारित करून १० फेब्रुवारी २००६ पासून संपूर्ण भारतात हा कायदा लागू करण्यात आला. या कायद्यानुसार `विशेष आर्थिक क्षेत्र` म्हणजे मुद्दाम व्यवहारासाठी व कराaसाठी, परदेशी मुलूख समजण्यात येईल अशा क्षेत्रातील उद्योग हे वस्तूंच्या उत्पादनासाठी व सेवा पुरवठा करण्यासाठी स्थापन करता येतील.

`विशेष आर्थिक क्षेत्र` नियम २००६ मध्ये विकास क्षेत्रांची व्याख्या केली आहे. त्यानुसार विशेष आर्थिक क्षेत्रामध्ये वस्तू उत्पादन सेवा या बरोबरच मुक्त व्यापार व वखार यांचा समावेश केला असून विशेष आर्थिक क्षेत्राचे पुढील ३ प्रकार असू शकतात.

१) नानाविध उत्पादनासाठीचे वि. आ. क्षे. (SEZ for Multi Products)
२) विशिष्ट क्षेत्रासाठीचे वि. आ. क्षे. (SEZ for Special Sector)
३) बंदर अथवा विमान क्षेत्रातील वि. आ. क्षे. (SEZ for port of Airport)

सरकारने वि. आ. क्षे. ला परवानगी देतांना बरौल तीनपैकी कोणत्या प्रकाराच्या वि. आ. क्षे.ला अनुमती दिलेली आहे ते नमूद केले आहे.

भारतात वि. आ. क्षे. ची स्थापना कोणास करता येऊ शकेल या संदर्भात विआक्ष कायदा २००५ कलम ३(१) नुसार केंद्र सरकार/ राज्य सरकार किंवा व्यक्ती स्वतंत्रपण संयुक्तपण वि.आ.क्षे. ची स्थापना करू शकते. (कलम २ (५) नुसार व्यक्ती म्हणजे भारतातील भारताबाहेरील रहिवासी एकत्र संयुक्त हिंदू कुटूंब संयुक्त सहकारी संस्था, भागीदारी संस्था, नोंदविलेली / न नोंदविलेली स्थानिक स्वराज्य संस्था व वरीलपैकी कुणाचीही एजन्सी शाखा कार्यालय होय.) `विशेष आर्थिक क्षेत्र` सुरु करण्यास विकासक अशी संज्ञा कायद्यात वापरली आहे. या विशेष कायद्यानुसार देशांतर्गत विशेष आर्थिक क्षेत्र उभारण्याची जबाबदारी खाजगी / सार्वजनिक / परदेशी कंपनी सोबत काही ठिकाणी महाराष्ट्र आद्योगिक विकास निगम सारख्या महामंडळावर आकरण्यात आली होती. भारतासारख्या लोकशाहीप्रधान देशात अशी शेकडो बेटे तयार होणार आहेत जिथे विशेष आर्थिक क्षेत्राच्या कायद्यानुसार हे विभाग अभिमत विदेशी क्षेत्र आहेत त्यामुळे प्रत्येक विशेष आर्थिक क्षेत्र म्हणजे एखादे परदेशी बेट असणार आहे. अशा बेटांच्या निर्मितीचा धडाका सुरु झाला आहे. २००५ फेब्रुवारी २००६ या चार महिन्यात वि.आ.क्षे.ची संख्या ६७ वरून एकदम ११७ वर गेली म्हणजेच ४२ दिवशी दोन पेक्षा अधिक विशेष आर्थिक क्षेत्राला मंजुरी देण्यात आली होती.

`विशेष आर्थिक क्षेत्रामध्ये उद्योग सुरु करण्यावर केवळ एकच बंधन आहे ते म्हणजे उत्पादन सुरु केल्यापासून सलग ५ वर्षाच्या आयातीसाठी, खर्चासाठी नफा, लाभांश, व्याज, स्वामित्व धन इ. ची रक्कम विदेशात नेण्यासाठी वापरलेल्या परकिय चलनापेक्षा जास्त असावयास हवी.``

थोडक्यात `विशेष आर्थिक क्षेत्र` म्हणजे व्यापार उद्योग स्थापन करण्यासाठीचे असे खास क्षेत्र / विभाग की जेथे कोणत्याही प्रकारचे कर नाही, उत्पादन शुल्क नाही, कामगार कायदे नसतात किंवा अधिलाभांशाची देखील भानगड नाही व असे टापू विकसीत करण्यासाठी राज्य सरकारने केंद्र सरकारने धोरणात्मक अनुमती दिली आहे. त्यामुळे या विभागात उद्योग सुरु करण्यासाठी परवान्याची अनुमतीची गरज नसेल असे क्षेत्र म्हणजे देशांतर्गत स्वायत्त परकीय मुलूख असणार आहेत. साहजिकच या सवलती प्राप्त करण्यासाठी खाजगी उद्योगांमध्ये स्पर्धा निर्माण झाली आहे व सरकारने देखील फारशी अनुमती दिली आहे. विशेष आर्थिक क्षेत्रामुळे विकासाला चालना मिळेल, निर्यात वाढेल व या भागात दळवणवळण व दूरसंचाराच्या सेवा जागतिक दर्जाच्या उपलब्ध होतील. सोबतच खेळाचे मैदाने, शाळा, महाविद्यालये, ज्ञानकेंद्र, पंचतारांकित उपाहारगृहे, सुसज्ज एकछत्री भांडारे या सर्वांमुळे रोजगाराच्या व्यापक संघी मिळतील असे गुलाबी स्वप्ने रंगविली जात आहे. वस्तुस्थिती कशी असेल काय या बद्दल शंका आहे. याचे कारण म्हणजे `विशेष आर्थिक क्षेत्र` संदर्भातील पुढील समस्या होय.

**सेझ व रोजगार विषयक समस्या :**

रोजगार निर्मितीची मोठी संधी म्हणून `विशेष आर्थिक क्षेत्र` च्या प्रारूपाकडे पाहण्यात येत आहे. विशेष आर्थिक क्षेत्रापुढील दिड वर्षात पाच लाख नवे रोजगार उपलब्ध होतील तर २०१० सालापर्यंत १५ लाख लोकांना रोजगार मिळेल. असा दावा वाणिज्यमंत्री कमलनाथ यांनी केला आहे. बेरोजगारी हो देशातील गंभीर समस्या आहे. तिचे निराकरण करण्यासाठी उद्योगनिर्मिती आवश्यक आहे. पण त्यासाठी आवश्यक असणारी आर्थिक सार्वजनिक क्षेत्राद्वारे करणे सरकारला शक्य नाही. खाजगी क्षेत्राला प्राधान्य देणे हाच पर्याय आहे. त्यांना प्रोत्साहन मिळेल अशी धोरणे राबविणे सरकारच्या हाती असल्याने विशेष आर्थिक क्षेत्राचे प्रारूप अंमलात आणण्याचा निर्णय घेतला गेला. यास खाजगी सेवांमुळे रोजगार समस्या सुटेल काय हा खरा प्रश्न आहे. कारण जागतिकीकरणानंतर बंदिस्त व्यवस्थेतील संरक्षण गमावलेल्या औद्योगिक क्षेत्राची आजपर्यंतची कामगारी फारशी आशादायक नाही. त्यापूर्वीही लोकांना पर्याय नसल्याने ती निदान टिकून राहिली. सवलतीच्या बाबतीत म्हणाल तर औद्योगिक जगताला सरकारकडून मिळणाऱ्या सवलती कधीच कमी नव्हत्या. स्वस्त कामगार मिळण्याच्या दृष्टीने अनुकूल असणारे कायदे, शासनाकडून मिळणाऱ्या स्वस्त पायाभूत सुविधा, करांमध्ये विविध सवलती अंतर्गत बाजारात मिळणारे संरक्षण, उत्पादनातील एकाधिकार, बँकांनी हजारो कोटीचे कर्ज वसूल करण्यात दाखविलेले हेतूपुरस्कार दुर्लक्ष या साऱ्यांची गोळाबेरीज केली तर गुटगुटीत बारसे धरायला हवे होते. यामुळे औद्योगिक विकास यामुळे खुटला आहे.

तसेच विशेष आर्थिक क्षेत्रामुळे नेमका रोजगार किती मिळेल याबद्दल अभ्यास नाही समजा `विशेष आर्थिक क्षेत्र` यशस्वी झाले तर इतर क्षेत्रातील उद्योगांनी काय करावे ही समस्या निर्माण होईल. वस्तुतः भारतातील औद्यागिक क्षेत्र परदेशी तंत्रज्ञानाच्या मानाने मागे आहे ते अट्टाहासाने स्पर्धेत आणले तरी ते यशस्वी ठरेलच असे नाही.

**`सेझ` व त्या अंतर्गत विविध उद्योग :**

विशेष आर्थिक क्षेत्राअंतर्गत विविध उद्योग सुरु होणार आहेत. त्यात प्रामुख्याने माहिती तंत्रज्ञान, उद्योग, हिरे, दागिन, हस्तकला हे उद्योग असतील, आज औद्योगिक क्षेत्राने कितीही उत्पादन केले तरी स्पर्धेमुळे जागतिक बाजारात टिकत नाही व देशांर्तगत लोकांची क्रयशक्ती घटल्यामुळे प्रभावी मागणी नाही तसेच

विकासाची गंगोत्री समजले जाणारे पोलाद, सिमेंट व उर्जानिर्मिती क्षेत्र विशेष आर्थिक क्षेत्रापासून दूर आहे. विशेष आर्थिक क्षेत्र अंतर्गत कृषी प्रक्रिया उद्योगावर भर दिला नाही. ही बाब आपल्यासारख्या कृषीप्रधान देशाच्या दृष्टीने मान्य होण्यासारखी नाही. भारताच्या एकूण लोकसंख्या ६० % जनता कृषी क्षेत्राशी निगडीत असतांना या क्षेत्रास डावलून विशेष आर्थिक क्षेत्रामध्ये कृषीप्रक्रिया आधारीत प्रक्रिया उद्योग सुरु न ठेवणे हा मूर्खपणा आहे तसेच विशेष आर्थिक क्षेत्राअंतर्गत उद्योगांमुळे सर्वाधिक रोजगार निर्माण करणारे लघु उद्योग व ग्रामाद्योग बंद पडतील. विशेष आर्थिक क्षेत्राबाहेरील उद्योगावर याचा किती परिणाम होईल ? किती कारखाने स्पर्धेत टिकण्यामुळे आजारी बंद होईल ? त्यामुळे बहुआयातीतील समस्या निर्माण होतील याबद्दल फारसा गांभीर्याने विचार केला नाही.

**`सेझ`व कामागार क्षेत्र :**

केंद्र व राज्य सरकारांनी विशेष आर्थिक क्षेत्रातील गुंतवणूकदारांवर सवलती उधळल्या आहे. मालकांना हवे असलेले कामगार कायद्यातील बदल मान्य केले आहेत. औद्योगिक कलह कायद्यातील टाळेबंदी, कामबंद असलेल्या कारखान्यांना बंद करण्यास, कामगारांना कमी करण्यास रोखणारी २५ कलम रद्द करण्यास परवानगी दिल्याने कामगारांची ससेहोलपट होईल. महिलांना रात्री कामावर येण्यास मुभा देण्यात आली आहे. कंत्राटी कामावर कोणतीही बंधंने राहणार नाही. आठवड्यात ४८ तास काम करण्याऐवजी ६० तास काम करावे लागते. किमान वेतन, त्याची नोंद अंमलबजावणी अनावश्यक असेल. कामगारांना सुरक्षा आरोग्य सुविधा मिळण्यासाठी बनवलेल्या कारखाना अधिनियमांची अंमलबजावणी होणे कठीण आहे. कामाच्या पाळीचे तास, कामगारांनी करावयाचे कामे यावर बंधन राहणार नाही. दुकाने व आस्थापनाचा फायदा कागदावरच राहील. बोनस तत्सम विवाद कामगार आयुक्तांऐवजी क्षेत्रविकास अधिकाऱ्याच्या कक्षेत येईल. सर्व प्रकारचे परवाने क्षेत्रविकास अधिकाऱ्याकडून घ्यावे लागतील. कामगार संघटनांना बाहेरचे अनुभवी नेतृत्व स्वीकारता येणार नाही. सर्व विवाद औद्योगिक न्यायालय, कामगार आयुक्तांच्या कक्षेबाहेर असतील, क्षेत्र विकास अधिकाऱ्यांना अमर्याद अधिकार देण्यात येणार असल्याने नोकरशाहीची पकड घट्ट होईल. या प्रक्रिया व अंमलबजावणी यांची फारकत हे लोकशाहीचे वैशिष्टे आपण हरवून बसू. अखंड लढ्यातून आणि परिश्रमातून मिळविलेले कामगार कायद्याचे संरक्षण विशेष आर्थिक क्षेत्रातील कामगारांकडून काढले जाईल. कामगार चळवळ ५० वर्ष मागे जाईल. थोडेसे बस्तान बसताच विशेष आर्थिक सवलती क्षेत्राबाहेरील निर्यातदारांना मिळविण्यासाठी मालक वर्ग शासनावर दबाव आणतील.

**`सेझ` व शेतजमीनीची समस्या :**

भारतात जे काही `विशेष आर्थिक क्षेत्र` अस्तित्वात येणार आहे ते सुरु करण्यासाठी प्रचंड प्रमाणावर शेत जमीनीची आवश्यकता भासणार आहे. या दृष्टीने मोठा प्रश्न उभा राहणार आहे तो म्हणजे इतक्या मोठ्या जमीन उद्योगांना उपलब्ध होणार का ? मुळातच आपला देश शेती प्रधान असून १००% शेतकरी हे २ हेक्टरपेक्षा कमी जमीनीचे मालक आहेत ते सहजासहजी आपले उपजीविकेचे साधन सरकारला देतील का ?

१ हेक्टर म्हणजे २.५ एकर किंवा १०००० चौ. मीटर याचा अर्थ बहुउत्पादने वि.आ.क्षे. साठी किमान २५०० एकर किंवा १ कोटी चौ. मीटर जागेची अट घालण्यात आली आहे. विशेष आर्थिक क्षेत्राच्या एकूण २५ % जमीन ही प्रक्रियेसाठीचे क्षेत्र म्हणून विकसीत करणे बंधनकारक आहे. याचा अर्थ उर्वरीत ७५ % जमीनी निवासी, व्यापारी किंवा मनोरंजन, शिक्षण, आरोग्यसेवा इत्यादी कामासाठी वापरता येणार आहे.

थोडक्यात `सेझ` साठी सिंचित व सुपीक जमीन इतक्या प्रचंड प्रमाणात गेल्यावर शेतकऱ्यांच्या उपजिविकेचे साधन उरणार नाही. उर्वरीत काळात त्यांनी काय करावे अशी भविष्याची चिंता असल्यामुळे शेतजमोनी ताब्यात देण्यासाठी संपूर्ण महाराष्ट्र व देशात 'सेझ' विरोधी वातावरण निर्माण झाले आहे. तसेच आपल्या देशात जमीनीवर मालकी हक्क सरकारचा नाही तर शेतकऱ्यांचा आहे. तसेच आपल्या देशात लोकशाही असल्यामुळे शेतकऱ्यांच्या मालकी हक्कावर गदा आणणे शक्य नाही त्यामुळे `सेझ` साठी जमीन हस्तांतरण करणे हीच खरी समस्या आहे.

तसेच विशेष आर्थिक क्षेत्रात उद्योग समूह जी जमीन संपादन करणार तो इतक्या औद्योगिक प्रकल्पांना लागणार का ? केवळ जमीन कमी किंमतीत मिळते म्हणून उद्योग समजू व बिल्डर्स मोठ्या प्रमाणात जमिनी कब्जा करतील व कोट्यावधी रुपये कमवतील ही बाब लक्षात घ्यावी लागेल.

आपण आपले `सेझ` धोरण आखतांना चीनचा आदर्श डोळ्यासमोर ठेवला. परंतु चीन व भारतातील `सेझ` धोरणात मुख्य फरक जमीनी संबंधीचा आहे. चीनमध्ये सरकारची जमीनीवर मालकी असल्याने स्वतः जमीन विकसीत केली व नंतर खाजगी उद्योगांना आमंत्रित करून आपले उद्योग सुरु करण्यास सांगितले. भारतात मात्र खाजगी उद्योजकांना जमीन संपादीत करून सरकार विकासासाठी खाजगी उद्योजकांना देत होती. त्यात परिवर्तन करून नवीन आदेशांमुळे विकासकांनाच जमीन स्वतः खरेदी करावी लागणार आहे.

तसेच विस्थापितांसाठी सरकार नेमका काय करणार याबद्दल साशंकता आहे. पं. बंगाल वगळता, अन्य कुठल्याही राज्य सरकारने धारणाबाबत पारदर्शकता दाखवली नाही तेथे खाजगी कंपनी व औद्योगिक विकास महामंडळाने सरकारने करार केला असून त्यानुसार काही 'सेझ' मंडळ यात ५०-५० संयुक्त भागीदारीत विकसित केले जाणार आहे. तसेच जमीन गमाविलेल्यांना प्रत्येकास १० चौ. मी. इतक्या आकाराचे दुकान `सेझ` मध्ये बांधून दिले जाईल. छोट्या स्वरूपाचा व्यवसाय करण्यासाठी २० हजार गाळे उभारले जातील. प्रशिक्षण संस्थेमार्फत नळ दुरुस्ती, विद्युत उपकरणे दुरुस्ती या संबंधी प्रशिक्षण माफत दिले जाणार आहे. संपादनात घरे गेली असेल त्यांना पर्यायी जागेवर घरे बांधून देणं `सेझ` अंतर्गत रुग्णालयात ५ % वाटा विस्थापितांसाठी व यात मोफत उपचार केले जातील. शिक्षण संस्थेत प्रवेशासाठी ५ % जागा आरक्षित करणे अशा सामजिक तरतुदी केल्या आहेत.

**`सेझ` व राजकीय परिस्थिती :**

सेझ बद्दल खरे पाहिले तर कुठल्याही पक्षाने अभ्यापूर्वक तयारी/विरोध केलेला नाही.

विशेषतः प्रचंड आकाराच्या `सेझ` मुळे विस्थापितांचे पुनर्वसन उपजीविकेची सुरक्षा, शेतजमीनीच्या औद्योगिक रुपांतरामुळे अन्नधान्य निर्मितीवर होणारा परिणाम शहरीकरणाच्या वाढत्या आकारामुळे पाणी ऊर्जा क्षेत्रावर होणारा परिणाम एकूणच `सेझ` च्या पर्यावरणावर येथील सांस्कृतिक जीवनावर व सामाजिक मूल्यांवर नेमके काय होणार या बाबीकडे राजकीय पक्षांनी विशेष लक्ष दिले नाही.

रोजगाराच्या नावे उद्योग उभारणी करणारी सरकार महाराष्ट्र काय वा पश्चिम बंगालमध्ये काय ? हजारो बंद पडलेल्या कारखान्याविषयी स्पष्ट बालणे, धोरण ठरविणे टाळतात. जिथे दुसरा पक्ष सत्तेवर आहे तेथेच विरोधी पक्ष म्हणून सदर कारखाने गिरण्याबद्दलची जमीनच नव्या उद्योगासाठी वापरणे/कायदे न वापरता हिरव्यागार शेती व जमिनीशी जोडलेली लाखो वृक्षसंपदायुक्त जमीन कंपन्यांना हस्तांतरीत करणे ही कुठली राजकीय निती आहे.

तसेच ज्यांच्या शेतजमीनी जाणार त्यांचे पुनर्वसन करण्यासाठी अधिक कडक कायदे करण्यासंदर्भात सरकारच्या उदासीन दृष्टीकोनामुळे भविष्यात ग्रामीण भागात

दारिद्यात भर पडून त्याचा एकूणच ग्रामीण समाजावर विपरीत परिणाम होईल याबद्दल सरकार फारसे जागरूक नाही.

**`सेझ` व रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया :**

'सेझ' उभारणीच्या संदर्भात केंद्र सरकारने आपले वित्त विषयक धोरण आखतांना फारशी काळजी घेतली नाही. या `सेझ` साठी लागणारे फ्रांड भांडवल बँकांकडून उभारावे असे मोघमपणे म्हटले आहे. परंतु रिझर्व्ह बँकने असे जाहिर केले की विशेष आर्थिक क्षेत्रात जे उद्योग प्रस्थापित होणार आहेत जे उभारलेले कारखाने घेणार आहेत या सर्व उद्योगांना बँकांनी वास्तविक संपदा व्यापारी उद्योग समजावे त्यांना प्रचलीत दरानेच कर्ज द्यावे. याचा उद्देश असाही असेल की बांधकाम व्यवसाय करणाऱ्यांनी किंवा वास्तविक संपदा याचा व्यवसाय करणाऱ्यांनी सवलतीच्या दराचा फायदा घेऊ नये व हे एका दृष्टीने बरोबर आहे. याच बरोबर जागतिक बँकेने सुध्दा भारतात या बाबतीत थोडासा धोक्याचा इशारा दिला आहे. याचे म्हणणे असे आहे की दिलेल्या सवलतीमुळे उद्योग व व्यापार या क्षेत्रामध्ये येतील व त्यामुळे प्रादेशिक असमतोल सारखे बरेच प्रश्न निर्माण होतील.

**'सेझ' व लघु उद्योग :**

`सेझ` मधील लघु उद्योगासाठी राखीव असलेल्या वस्तुचे उत्पादन हे कायद्यातील तरतुदींमुळे करता येणार असल्यामुळे या क्षेत्राबाहेरील लघुउद्योग मोडकळीस येत आहेत.

`सेझ` मुळे सर्वच छोटमोठे उद्योग 'सेझ' अंतर्गत उद्योग सुरु करता येतील असे म्हटले आहे. परंतु प्रत्यक्षात वि.आ.क्षे. मधील जमिनीचे भाडे व भांडवलाची करावी लागणारी प्रचंड गुंतवणूक यामुळे विआक्षमध्ये लहान व मध्यम उद्योग सुरु होऊ शकणार नाहीत. विशेष आर्थिक क्षेत्राबाहर असे उद्योग सुरु केले तर त्यांना सवलती मिळणार नाहीत. सबब उत्पादन खर्च वाढून किमती वाढतील त्यामुळे असे उद्योग बंद पडतील विशेष आर्थिक क्षेत्रामुळे मोठ्या उद्योगांना देण्यात येणाऱ्या सवलतीमुळे जवळपास ७० ते ८० हजार लघुउद्योग बंद पडले असून `सेझ` मुळे भविष्यात अधिक लघुउद्योग संपुष्टात येतील त्यामुळे सहाजिकच लघुउद्योग क्षेत्र मोडकळीस येण्याची शक्यता अधिक आहे.

**`सेझ` कायद्यातील संदिग्धता :**

`सेझ` च्या निर्मितीसाठी स्वतंत्र कायदा करण्यात आला असला तरी या पुढील महत्वपूर्ण बाबींच्या संदर्भात संदिग्धता आहे. त्यामुळे भविष्यात पुढील प्रश्न निर्माण होतील.

१) विकासकाने खरेदी केलेल्या एकूण जागेपैकी आता ७५ % ऐवजी ५० % जागा प्रक्रिया विरहीत क्षेत्र व ५०% जागा प्रक्रिया क्षेत्र म्हणून यास वापरता येईल. विकासकाने जर ५० % प्रक्रिया विरहीत क्षेत्र जागा विकसीत केली व ५० % राखून ठेवलीत तर शासन काय करू शकेल याबद्दल खुलासा नाही.

२) ५०% जागा विकसित करून विआक्षेमध्ये उद्योग करणाऱ्यांना द्यावयाची आहे. परंतु जागा विकसित करून उद्योजक आले नाही तर त्या जागेचे वाटप कसे करावे याबद्दल खुलासा नाही.

३) विआक्षेमध्ये कायदा व सुव्यवस्थेची समस्या कोण व कशी सोडविणार याचा उल्लेख कायद्यात नाही.

४) विआक्षेमधील जमिनीवर बांधकाम करतांना कोणते नियम लागू होतील याबाबत खुलासा नाही.

**उपाय :**

विशेष आर्थिक क्षेत्रासंबंधी इ. स. २००५ चा कायदा व त्या अनुषंगाने येणारे प्रकल्प यांना केवळ ज्यांची शेतजमीन अधिग्रहण केली जात आहे त्यांच्याकडून नव्हे तर मान्यवर, विद्वान, अर्थतज्ञ, पर्यावरणतज्ञ, सामाजिक कार्यकर्त, गैरसरकारी संघटना यांच्याकडून व्यापक प्रमाणावर विरोध व गंभीर प्रश्न उपस्थित केले जात आहेत. आज जागतिकीकरणाला पर्याय नाही, कारण जागतिकीकरणामळे येऊ घातलेली औद्योगिक संस्कृती मुळातच भारतासारख्या शेती संस्कृतीवर व ग्रामीण अर्थव्यवस्थेवर परिणाम केल्याशिवाय राहणार नाही.

**संदर्भ ग्रंथ :**

I. किनारे प. रा. – सेझ शाप / वरदान, लोकसत्ता, ४ डिसेंबर २००६

II. कुळकर्णी अरविंद, सेझचे एक आवाहन, लोकसत्ता, १७ फेब्रुवारी २००७

III. यादव एस. एस., सेझ भ्रमाचा भोपळा, लोकसत्ता, २७ नोव्हेंबर २००६

IV. गोविलकर विनायक, विशेष आर्थिक क्षेत्र की विशेष आपत्ती क्षेत्र, डिसेंबर २००६ (प्रकाशक – समग्र अध्यापन केंद्र)

V. संपादकीय लेख, लोकसत्ता, ६ एप्रिल २००७

VI. सावडे भ. रा., विशेष आर्थिक क्षेत्र, लोकसत्ता, १९ जुलै २००६

VII. आंदोलन मासिक जुलै २००६, जानेवारी २००७, फेब्रुवारी २००७

VIII. Need for sensible SEZ Policy by Times of India, Oct 13, 2006

IX. झवर रमेश, विशेष आर्थिक क्षेत्राची भानगड, लोकसत्ता, ९ आक्टोबर २००६